**लेखा अनुदान २००५-२००६**
मागणी क्रमांक बी-१०, मुख्य लेखाशीर्ष
"७६१०-शासकीय कर्मचारी इत्यादींना कर्जे"

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग

शासन निर्णय क्रमांक एचबीए-०२०४/११६८/सीआर-१८०/आस्था-१,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ दिनांक: २८ जून २००५.

**वाचा** : १) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अंदाज-१०.०५/सीआर-३९/२००५/अर्थसंकल्प-3, दि.३१.३.२००५.
२) शासन पत्र, गृह विभाग क्र.बीजीटी-१००५/७६१०/२००५-२००६/बीयुडी-१, दि.७.५.२००५.
३) शासन निर्णय, गृह विभाग क्र.एचबीए-०२०४/११६८/सीआर-१८०/आस्था-१, दि.११.५.२००५.
४) शासन पत्र, गृह विभाग क्र.बीजीटी-१००५/७६१०/२००५-२००६/बीयुडी-१, दि.१८.६.२००५.

**शासन निर्णय** : सन २००५-२००६ या वित्तीय वर्षाकरिता मागणी क्र.बी-१० "७६१०-शासकीय कर्मचारी इत्यादींना कर्जे" या मुख्यलेखाशिर्षाखाली रु.२६,९४,३०,०००/- (रुपये सव्वीस कोटी चौ-याण्णव लाख तीस हजार फक्त) एवढी अर्थसंकल्पिय तरतूद मंजूर करण्यात आलेली आहे. या तरतूदीपैकी ३० जून २००५ पर्यंतचा तिमाही खर्च भागविण्यासाठी शासन पत्र, गृह विभाग क्र.बीजीटी-१००५/७६१०/२००५-२००६/बीयुडी-१, दि.१८.६.२००५ अन्वये रु.६,७३,००,००० (रुपये सहा कोटी त्र्याहत्तर लाख फक्त) एवढा निधी मंजूर करण्यात आला आहे. त्यामध्यें शासन निर्णय, गृह विभाग क्र.एचबीए-०२०४/११६८/सीआर-१८०/आस्था-१, दि.११.५.२००५ अन्वये मंजूर करण्यात आलेल्या रु.४,४९,०५,०००/- तरतूदीचा समावेश आहे. माहे जून २००५ पर्यंतच्या तिमाहीकरिता मंजूर करण्यात आलेला रु.६,७३,००,०००/- एवढा निधी गृह विभाग (खुद्द) व गृह विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली येणाऱ्या विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख यांना त्यांची मागणी विचारात घेऊन सोबतच्या विवरणपत्राप्रमाणे गौणशीर्षनिहाय चिन्हांकित (EARMARK) तसेच उपलब्ध असल्याचे प्रमाणित करुन देण्यात येत आहे. <u>उपरोक्त निधी हा ३० जून २००५ पर्यंत खर्ची टाकण्यात यावा. चिन्हांकित (EARMARK) करण्यात आलेला निधी विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुखांच्या कार्यालयांनी जून २००५ पर्यंतच्या तिमाहीत जर खर्च केला नाही तर तो पुढील महिन्यात वापरण्यास अनुमती देता येणार नाही. याबाबतची सर्व जबाबदारी सर्व विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुखांची राहील.</u> तसेच याबाबतच्या खर्चमेळाचा ताळमेळ तात्काळ कळविण्याची जबाबदारी विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुखांची राहील. अन्यथा त्यांच्या कार्यालयांना जून २००५ नंतरच्या पुढील महिन्यासाठी निधी उपलब्ध होऊ शकणार नाही.

२. शासन आता असे निदेश देत आहे की, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला उप विभाग एक ते पाच मधील अनुक्रमांक ११, १२, १३-अ व १४ येथील तरतुदीनुसार अनुक्रमे <u>घरबांधणी अग्रीम, मोटार वाहन अग्रीम, संगणक अग्रीम व सायकल अग्रीम</u> मंजूर करण्याचे अधिकार हे क्षेत्रीय कार्यालय प्रमुखांना प्रदत्त असल्याने या प्रयोजनाकरिता गौण शीर्षनिहाय चिन्हांकित करण्यात आलेली तरतूद <u>ही उपलब्धही</u> असल्याचे समजण्यात यावे. त्यानुसार आपले आस्थापनेवरील अधिकारी/कर्मचारी यांची वरील गौणशीर्षाखालील अग्रीम मंजूरीची प्रकरणे त्वरीत निकाली काढावीत. अधिकारी/कर्मचारी यांना अग्रीमाची रक्कम मिळण्यास अकारण दिरंगाई होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

3. शासन असेही निदेश देत आहे की, शासन निर्णय, गृह विभाग क्र.एचबीओ-०१००/२०९०/सीआर-३१८/आस्था-१, दि.५ ऑक्टोबर २००१ नुसार आता "निधी उपलब्धता" प्रमाणपत्र प्राप्त करण्यासाठी शासनास प्रस्ताव सादर न करता आपले स्तरावर संबंधित नियमातील तरतुदीच्या अधिन राहून अग्रीमाची प्रकरणे मंजूर करावीत. असे करतांना कुठल्याही परिस्थितीत उपलब्ध करुन दिलेल्या निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता घ्यावी. याबाबत कोणतीही सबब/स्पष्टीकरण विचारात घेतले जाणार नाही.

(क्र.मा.प.)

४. असेही निदेश देण्यात येत आहे की, उपलब्ध करुन दिलेल्या वरील रकमेचा खर्च ताळमेळ महालेखापाल यांचे कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिका प्रकरण १४ मधील नियम १५७ च्या परिशिष्ट ३ तसेच शासनामार्फत वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार योग्य प्रकारे व योग्य वेळी करुन त्याबाबतची प्रमाणीत माहिती शासनास विहित मुदतीत पाठविण्यात यावी. खर्चमेळाची माहिती महालेखापाल यांचे कार्यालयाकडून प्रमाणीत करुन पाठविण्याची संपूर्ण जबाबदारी ही क्षेत्रीय विभाग/कार्यालय प्रमुख म्हणून आपली राहिल व त्याप्रमाणे प्रमाणित माहिती न पाठविणाऱ्या कार्यालयातील संबंधितांवर जबाबदारी निश्चित करुन कारवाई करणे भाग पडेल याची कृपया नोंद घ्यावी. प्रमाणित न केलेली माहिती स्विकारण्यात येणार नाही व या कारणामुळे विलंब झाल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी क्षेत्रीय विभाग/कार्यालय प्रमुखाची राहील.

५. वरील आदेशांचे काटेकोर पालन करुन मागणी क्र.बी-१० "७६१०-शासकीय कर्मचारी इत्यादिना कर्जे" या लेखाशिर्षाखालील २०१, घरबांधणी अग्रीमे / २०२, मोटार वाहन अग्रीमे / २०३, इतर वाहन अग्रीमे / २०४, संगणक खरेदी अग्रीमे या गौणशीर्षानिहाय अग्रीमाची प्रकरणे संबंधित नियमांच्या अधिन राहून, उपलब्ध निधीच्या मर्यादेत मंजूर करावीत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( वि.फ. वसावे )
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
महासंचालक, ॲन्टी करप्शन ब्युरो, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
संचालक, नागरी संरक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
महासमादेशक, होमगार्डस्, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई
संचालक, सरकारी अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
महालेखापाल-१, (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
महालेखापाल-२, (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
अवर सचिव, वित्त विभाग/अर्थसंकल्प-७, मंत्रालय, मुंबई.
स्वीय सहायक, अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
स्वीय सहायक, प्रधान सचिव (अपील व सुरक्षा), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
स्वीय सहायक, प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
गृह विभागातील सर्व सह सचिव / उप सचिव, मंत्रालय, मुंबई.
अवर सचिव (रोखशाखा), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
अवर सचिव (कार्यासन बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
कक्ष अधिकारी (आस्थापना-२), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती / कार्यासन आस्थापना-१.

चिन्हांकित निधीचे विवरणपत्र वित्तीय वर्ष २००५-२००६

गृह विभाग, मागणी क्र.बी-१०

मुख्य लेखाशिर्ष "७६१०, शासकीय कर्मचारी इत्यादिंना कर्जे"

(शासन निर्णय,गृह विभाग क्र.एचबीए-०२०४/११६८/सीआर-१८०/आस्था-१, दि.२८ जून २००५ चे सहपत्र)

(रुपये हजारात)

| अ.क्र. | विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख | "७६१०, शासकीय कर्मचारी इत्यादिना कर्जे" या लेखाशिर्षा अंतर्गत दि.३०.६.२००५ पर्यंतच्या खर्चासाठी चिन्हांकित करण्यात आलेल्या निधीची रक्कम | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | घरबांधणी अग्रीम गौणशिर्ष २०१ (७६१०००८७) | मोटार वाहन अग्रीम गौणशिर्ष २०२ (७६१०००९६) | इतर वाहने अग्रीम गौणशिर्ष २०३ (७६१००१०२) | वैयक्तिक संगणक गौणशिर्ष २०४ (७६१०१८५१) |
| (१) | अपर मुख्य सचिव (गृह) | ८,०० | ४५ | -- | ४५ |
| (२) | पोल-१, गृह विभाग. | ४,०० | ४५ | -- | -- |
| (३) | पोलीस महासंचालक, म.रा., मुंबई. | ३,२८,४३ | ३९,२३ | १५ | १०,६८ |
| (४) | पोलीस आयुक्त, मुंबई. | २,००,०० | ४,४७ | -- | ३,१७ |
| (५) | महासंचालक, ॲन्टी करप्शन ब्यूरो,म.रा.,मुंबई. | ६,०० | ९० | -- | ९० |
| (६) | आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, म.रा., मुंबई. | ४,०० | ४५ | -- | -- |
| (७) | कारागृह महानिरीक्षक, म.रा., पुणे. | ५,०० | -- | -- | -- |
| (८) | परिवहन आयुक्त, म.रा., मुंबई. | ३,०० | -- | ९२ | ४५ |
| (९) | संचालक,न्याय.वैज्ञा.प्रयोगशाळा, म.रा., मुंबई. | ३४,०० | २,७० | ५ | १,८० |
| (१०) | संचालक, नागरी संरक्षण, म.रा., मुंबई. | ३,०० | ९० | -- | -- |
| (११) | महासमादेशक, होमगार्ड, म.रा., मुंबई. | ३,०० | ४५ | -- | -- |
| (१२) | प्रबंधक, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई. | ३,०० | -- | -- | -- |
| (१३) | महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई. | ३,०० | -- | -- | -- |
| (१४) | सरकारी अभियोग संचालनालय, म.रा., मुंबई. | -- | -- | -- | -- |
| | एकूण : | ६,०४,४३ | ५०,०० | १,१२ | १७,४५ |

( वि.फ. वसावे )

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन, गृह विभाग.